**राज्यातील कोणतेही निवासी हॉटेल, उपहारगृह किंवा खाद्यपदार्थ यामधील कामधंदा किंवा अशा प्रकियेतील अनुषंगिक असणारे काम किंवा अशा कोणत्याही उद्योगातील कामधंदा (मुंबई दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ मध्ये दिलेल्या व्याख्येनुसार) या अनुसूचित उद्योगातील कामगारांना सवलतीच्या दरात देण्यात येणाऱ्या वस्तुंचे रोखमूल्य निश्चित करण्यासाठी शासन, मालक प्रतिनिधी व कामगार प्रतिनिधी यांची त्रिपक्षीय समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : याचिका-१८१३/प्र.क्र.२४९/काम-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ११ सप्टेंबर, २०१८.

वाचा :- कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.काआ/ग्रावि/किवेअ/२०१८/कार्या-१०/११३६, दिनांक ६ ऑगस्ट, २०१८

**प्रस्तावना :-**

"राज्यातील कोणतेही निवासी हॉटेल, उपहारगृह किंवा खाद्यपदार्थ यामधील कामधंदा किंवा अशा प्रकियेतील अनुषंगिक असणारे काम किंवा अशा कोणत्याही उद्योगातील कामधंदा (मुंबई दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ मध्ये दिलेल्या व्याख्येनुसार)" या किमान वेतन अधिनियम, १९४८ अंतर्गत अनुसूचित उद्योगातील कामगारांचे किमान वेतन दरांचे पुन:निर्धारण शासनाने दिनांक ५ जुलै,२०१३ रोजीच्या अधिसूचनेद्वारे केले आहे. त्याविरुध्द दी नागपूर हॉटेल ऑनर्स असोसिएशन व इंडियन हॉटेल आणि रेस्टॉरंट असोसिएशन यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका क्र.५५४२/२०१३ दाखल केली आहे. याचिकेमध्ये दिनांक ५ जुलै, २०१३ रोजीच्या अधिसूचनेस स्थगिती देण्याची तसेच नियोक्त्यामार्फत कामगारांना देण्यात येणाऱ्या खाद्यपदार्थांपोटी (चहा, नाष्टा, जेवण) त्यांच्या वेतनातून करावयाची वजावट ठरविणे व इतर मुद्यांबाबत आदेश देण्याची विनंती केली आहे. त्यास अनुसरुन मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक १२ एप्रिल, २०१८ रोजी नियोक्त्यामार्फत कामगारांना देण्यात येणाऱ्या सवलतीच्या दरातील खाद्यपदार्थांचे रोखमूल्य निश्चित करण्याचे आदेश दिले आहेत. त्या अनुषंगाने कामगार आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली शासन प्रतिनिधी, मालक प्रतिनिधी आणि कामगार प्रतिनिधी यांचा समावेश असलेली त्रिपक्षीय समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"राज्यातील कोणतेही निवासी हॉटेल, उपहारगृह किंवा खाद्यपदार्थ यामधील कामधंदा किंवा अशा प्रकियेतील अनुषंगिक असणारे काम किंवा अशा कोणत्याही उद्योगातील कामधंदा (मुंबई दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ मध्ये दिलेल्या व्याख्येनुसार)" या किमान वेतन अधिनियम, १९४८ अंतर्गत अनुसूचित उद्योगातील कामगारांना सवलतीच्या दरात देण्यात

येणाऱ्या खाद्यपदार्थांचे रोखमूल्य निश्चित करण्यासाठी व किमान वेतन अधिनियम १९४८ मधील कलम ११ (२) लागू पडते का हे तपासण्यासाठी तसेच किमान वेतन अधिनियम १९४८ मधील कलम ११ (२) लागू पडत असेल तर त्याचे रोखमूल्य निश्चित करण्यासाठी कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली शासन, मालक प्रतिनिधी व कामगार प्रतिनिधी यांची त्रिपक्षीय समिती पुढीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

**शासनाचे प्रतिनिधी -**

| अ.क्र. | नांव | पदनाम |
|---|---|---|
| १ | कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सह सचिव / उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | कामगार उप आयुक्त, मुंबई | सदस्य |
| ४ | कामगार उप आयुक्त, नागपूर | सदस्य |
| ५ | कामगार उप आयुक्त, पुणे | सदस्य |
| ६ | कामगार उप आयुक्त, नाशिक | सदस्य |
| ७ | कामगार उप आयुक्त (ग्रा.वि.), मुंबई व सक्षम प्राधिकारी, किमान वेतन अधिनियम, १९४८ | सदस्य सचिव |

**मालक प्रतिनिधी -**

| | | |
|---|---|---|
| **मुंबई विभाग** | | |
| १ | श्री.संतोष आर.शेट्टी, इंडियन हॉटेल ॲण्ड रेस्टॉरंट असोसिएशन | सदस्य |
| २ | श्री.अरंविद शेट्टी, इंडियन हॉटेल ॲण्ड रेस्टॉरंट असोसिएशन | सदस्य |
| **पुणे विभाग** | | |
| ३ | श्री.कलगोंडा नरसगोडा पाटील, इचलकरंजी | सदस्य |
| ४ | श्री.पदनाभ शेट्टी, चिंचवड, पुणे, पिंपरी-चिंचवड हॉटेल ॲण्ड रेस्टॉरंट असोसिएशन | सदस्य |
| ५ | श्री.गोविंद प्रभाकर पानसरे, चिंचवड, पुणे पिंपरी-चिंचवड हॉटेल ॲण्ड रेस्टॉरंट असोसिएशन | सदस्य |
| **नाशिक विभाग** | | |
| ६ | श्री.स्वप्नील सुभाषचंद्र हेगडे, सिडको, नाशिक, नाशिक रेसिडेन्शियल हॉटेल ओनर्स असोसिएशन | सदस्य |
| **नागपूर विभाग** | | |
| ७ | श्री.तेजिंदर सिंग रेणू, गांधी बाग, नागपूर, रेसिडेन्शियल हॉटेल असोसिएशन, नागपूर | सदस्य |
| ८ | श्री.भवानी शंकर देव, नागपूर, दि नागपूर हॉटेल ओनर्स असोसिएशन | सदस्य |

**कामगार प्रतिनिधी सदस्य -**

| | | |
|---|---|---|
| **मुंबई विभाग** | | |
| १ | श्री.अनिल ढुमणे, मुंबई मजदूर संघ | सदस्य |
| २ | श्री.वर्गीस व्ही.व्ही., चिटणीस, भारतीय कामगार सेना, दादर (प) | सदस्य |
| ३ | श्री.विजय वालावलकर, चिटणीस, भारतीय कामगार सेना, दादर (प) | सदस्य |
| **पुणे विभाग** | | |
| ४ | श्री.अर्जुनदेव देवू चव्हाण, हॉटेल कामगार संघ, पुणे | सदस्य |
| ५ | श्री.सचिन मेंगाळे, हॉटेल कामगार संघ, पुणे | सदस्य |
| ६ | श्रीम.योगिता अरुण शेंडगे, अध्यक्ष, श्रम एवं जयते श्रमिक किमयागार संघ, पुणे | सदस्य |
| **नागपूर विभाग** | | |
| ७ | श्री.सुरेश पाटील, हॉटेल एम्प्लॉईज युनियन, नागपूर | सदस्य |
| ८ | श्री.अरुणपाल सिंग बहेल, महाराष्ट्र हॉटेल कर्मचारी संघटना | सदस्य |

२. उक्त समितीमध्ये नियुक्त केलेल्या अशासकीय सदस्यांना प्रचलित नियमाप्रमाणे प्रवास भत्ता व महागाई भत्ता अनुज्ञेय राहील.

३. सदर खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मुख्य लेखाशिर्ष मागणी क्रमांक के-४, २२३० कामगार व सेवायोजन (२२३००४१४) संचालन व प्रशासन यामधून भागविण्यात यावा.

४. समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील -

१) किमान वेतन अधिनियम, १९४८ कलम ११ (२) मध्ये, "ज्या बाबतीत वेतन पुर्णत: किंवा अंशत: ऐनजिनसी देण्याची प्रथा असून त्या त्या प्रकरणाच्या परिस्थितीमध्ये ते आवश्यक असे समुचित शासनाचे मत असेल त्या बाबतीत, समुचित शासन शासकीय राजपत्रातील अधिसूचनेद्वारे किमान वेतन पुर्णत: किंवा अंशत: देण्याविषयी प्राधिकृती देऊ शकेल" अशी तरतूद आहे. सदर तरतूद निवासी हॉटेल, उपहारगृह किंवा खाद्यपदार्थ यामधील कामधंदा किंवा अशा प्रक्रियेतील अनुषंगिक असणारे काम किंवा अशा कोणत्याही उद्योगातील कामधंदा यास लागू राहील का, हे तपासणे.

२) जर तरतूद लागू राहत असेल तर प्रस्तुत उद्योगातील रोखमूल्य अधिसूचनेद्वारे निर्गमित करण्यासाठी शासनास शिफारस करणे.

३) सदर समितीने वरील अ.क्र.१ व २ प्रमाणे कार्यवाही करुन १ महिन्याच्या आत शासनास अहवाल सादर करावा.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून,त्याचा संगणक संकेतांक २०१८०९१११४३६२८३६१० असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Shashank M. Sathe
Date: 2018.09.11 14:41:03 +05'30'

**(श. मा. साठे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक.
४. कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. समितीचे इतर सर्व सदस्य (व्दारा कामगार आयुक्त)
६. महालेखापाल-१ महाराष्ट्र (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
७. महालेखापाल-२ महाराष्ट्र (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता), नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०.उपसचिव ( कामगार) यांचे स्वीय सहाय्यक.
११.निवडनस्ती (कामगार-७).